राष्ट्रीय आयुष अभियान - औषधी वनस्पती घटकाकरीता सन २०१५-१६ चा राज्य हिश्याचा निधी वितरित करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय. क्र.आयुष-२०१६/प्र.क्र. ७०/९-अे**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक : ०२ जानेवारी, २०१७**

वाचा : १) केंद्र शासनाच्या आयुष मंत्रालयाचे पत्र क्र. Z-२८०१५/५०/२०१५-H & D Cell, १८/१२/२०१५
२) केंद्र शासनाच्या आयुष मंत्रालयाचे पत्र क्र. Z-१८०२०/४८/२००८-NMPB (pt.V), दि. २१/०१/२०१६
३) शासन निर्णय, कृषी व पदुम विभाग क्र. राफअ - २०१६/प्र.क्र.२२/९-अे, दि.२८/०३/२०१६
४) संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांचे पत्र क्र. मराफऔवमं/औ.वन/वाकृआ १६-१७/१६७५/१६, दि. ६/४/२०१६,

**प्रस्तावना :**

केंद्र शासनाच्या आयुष विभागामार्फत (Department of Ayurved, Yoga, Naturopathy, Unani, Siddha & Homeopathy AYUSH) राष्ट्रीय आयुष अभियान कार्यक्रम राबविण्यात येत आहे. केंद्र शासनाच्या आयुष मंत्रालयाने, संदर्भाधिन क्र.२ येथील पत्रान्वये राष्ट्रीय आयुष अभियान-औषधी वनस्पती घटक ही योजना सन २०१५-१६ मध्ये राज्यात राबविण्यास रू.२०५.८७७ लाख खर्चाच्या कार्यक्रमास मान्यता दिली आहे. सदरचे अभियान सन २०१५-१६ मध्ये राज्यात राबविण्यास संदर्भाधीन क्र.३ येथिल शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली असून केंद्र हिश्याची रक्कम रु.१२३.५२६२ लाख राष्ट्रीय आयुष अभियान - औषधी वनस्पती घटकाच्या अंमलबजावणीसाठी महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांना वितरित करण्यात आलेली आहे. राष्ट्रीय आयुष अभियान ही योजना केंद्र : राज्य हिस्सा ६० : ४० या प्रमाणानुसार राबविण्यात येत आहे. त्यानुसार केंद्र हिश्यापोटी प्राप्त रु.१२३.५२६२ लाख निधीच्या प्रमाणात राज्य हिश्याचा ४० टक्के निधी रु.८२.३५०८ लाख महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांना, सन २०१६-१७ मध्ये राज्य हिश्याकरीता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या निधीमधून, वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. शासनाने याबाबत पुढील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :**

राष्ट्रीय आयुष अभियान-औषधी वनस्पती घटक ही योजना सन २०१५-१६ मध्ये राज्यात राबविण्याकरीता केंद्र शासनाच्या आयुष मंत्रालयाच्या, संदर्भाधिन क्र.२ येथील पत्रान्वये रू.२०५.८७७ लाख खर्चाच्या कार्यक्रमास मान्यता दिली आहे. त्यानुसार केंद्र हिश्याचा ६० टक्के निधी संदर्भाधिन क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये वितरित करण्यात आला आहे. सन २०१५-१६ मधील राज्य हिश्याचा

४० टक्के निधी रु.८२.३५०८ लाख राष्ट्रीय आयुष अभियान- औषधी वनस्पती घटक या योजनेअंतर्गत विविध उद्यीष्टे पुर्ण करण्यासाठी, सन २०१६-१७ च्या अर्थसंकल्पित निधीमधून खर्च करण्यास वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

१. सदर योजनेसाठी उपलब्ध होणारा निधी खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

मागणी क्र. डी - ३
२४०१- पिक संवर्धन
११९- बागायती व भाजीपाला पिके
(०२)(२१) राष्ट्रीय आयुष अभियान- औषधी वनस्पती (केंद्र पुरस्कृत योजना)
राज्य हिस्सा (४० टक्के) (सर्वसाधारण) (२४०१ A१४५)
३३- अर्थसहाय्य

३. या योजनेसाठी मंजूर केलेला निधी खर्च करण्यास लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांना संनियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. या योजनेंतर्गत लाभ घेणाऱ्या लाभार्थ्यांची निवड पारदर्शकपणे करण्यात यावी. लाभार्थ्यांची यादी संपूर्ण तपशीलासह कृषि विभागाच्या/मंडळाच्या अधिकृत संकेत स्थळावर प्रसिध्द करण्यात यावी.

५. या शासन निर्णयान्वये उपलबध करुन देण्यात आलेल्या निधीचा तात्काळ विनियोग करण्यात यावा. तसेच निधी विनियोगाच्या अनुषंगाने,व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांनी वेळोवेळी उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

६. वरील प्रमाणे मंजूर केलेला निधी अर्थसंकल्पिय तरतुदीच्या मर्यादेत व मासिक निधी विवरण पत्राप्रमाणे वित्त विभागाने विकसीत केलेल्या "संगणकीय अर्थसंकल्प वितरण प्रणाली" मध्ये शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध आहे. शासन निर्णयाची काटेकोरपणे अमंलबजावणी होईल याची दक्षता आहरण व संवितरण अधिकारी यांनी घ्यावी. या योजनेसाठी खर्च करताना सर्व वित्तीय नियम, विनियम, वित्तीय शासन निर्णय, अधिसूचना, आदेश, केंद्र शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेले आदेश, केंद्रीय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचना आणि भारताचे नियत्रंक व महालेखापरिक्षक यांचे या संदर्भातील निरिक्षण आणि खर्चात अनियमतता होणार नाही यांचे पालन होईल या अटीच्या अधिन राहून निधी खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

७. प्रस्तुत आदेश शासन परिपत्रक वित्त विभाग, क्रमांक: अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९ /अर्थ -३ दि.२०.०४.२०१६ मधील अटींची पुर्तता करण्याच्या अधीन राहून, तसेच वित्त विभागाचा अनौपचारिक

संदर्भ क्रमांक ५१८/अर्थ-१३/१६/ दि.०९.११.२०१६ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहेत.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१०३१६३९०४७२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anil Vitthal Vishe

Digitally signed by Anil Vitthal Vishe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=74ca9dc2061da0ad3bea01df9e4b7d481e5cbddd04fda84d597e4e31691e5e7f, cn=Anil Vitthal Vishe
Date: 2017.01.03 16:43:44 +05'30'

**(अनिल वि.विशे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन,

**प्रति,**

१. मा. मंत्री (कृषी) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२
२. मा.राज्यमंत्री (कृषी) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२
३. सन्माननीय विधानसभा / विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र राज्य.
४. प्रधान सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक,मंत्रालय, मुंबई -३२
५. प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
६. आयुक्त कृषी, महाराष्ट्र राज्य,पुणे.
७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे.
८. संचालक आयुष, आयुर्वेद संचालनालय, शासकीय दंत महाविद्यालय आणि रुग्णालय इमारत, चौथा मजला, सेंट जॉर्जेस रुग्णालय, आवार, डिमोलो रोड, सी.एस.टी. मुंबई-४००००१
९. संचालक (फलोत्पादन), कृषी आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे,
१०. सर्व संचालक/ सर्व सहसंचालक कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे,
११. सर्व विभागीय कृषी सहसंचालक,
१२.सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी,
१३.सहाय्यक संचालक (लेखा) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१४.महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता ) (लेखा परीक्षा ) मुंबई /नागपूर,
१५.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१६.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
१७.संचालक लेखा व कोषागार अधिकारी, मुंबई,
१८. सहसंचालक लेखा व कोषागारे संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई -३२,
१९.माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२,
२०.निवड नस्ती .